स्वच्छ महाराष्ट्र अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी राज्यस्तरीय पुनर्विलोकन व संनियंत्रण समितीची स्थापना करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: स्वमअ-२०२०/प्र.क्र.१३/नवि-३४**
शहीद राजगुरू चौक, मदाम कामा मार्ग.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक १७ जानेवारी, २०२०**

**वाचा-**

शासन निर्णय क्रमांक: स्वभाअ-२०१५/प्र.क्र.२३/नवि-३४ दिनांक १५ मे २०१५

**प्रस्तावना-**

स्वच्छ भारत अभियान (नागरी) च्या धर्तीवर राज्यात स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) ची अंमलबजावणी संदर्भाधिन शासन निर्णयान्वये राज्यात सुरू आहे. सदर अभियान अंतर्गत नागरी राज्य हागणदारी मुक्त करण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाच्या गृहनिर्माण व शहरी कार्य मंत्रालयाने नामनिर्देशीत केलेल्या Center for Environmental Planning and Technology (CEPT) या संस्थेसोबत करण्यात आलेल्या सामंजस्य करारानुसार (MoU) नागरी महाराष्ट्र हागणदारी मुक्त करण्याच्यादृष्टीने तांत्रिक सहाय्य पुरविले जाते.

२. स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत राज्याचा नागरी भाग ऑक्टोंबर, २०१७ मध्ये हागणदारी मुक्त घोषित करण्यात आला. आता राज्यात शहरांनी ODF+, ODF++ करण्याकडे वाटचाल सुरू केली आहे. त्या अनुषंगाने आता मैला व सांडपाणी व्यवस्थापनावर (Faecal Sludge and Septage Management (FSSM)) वर भर देण्यात येत आहे.

३. Center for Environmental Planning and Technology (CEPT) या संस्थेसोबत करण्यात आलेल्या सामंजस्य करारानुसार (MoU) Faecal Sludge Treatment Plant (FSTP) कार्यक्रमाच्या अंमलबजावणी व सनियंत्रणासाठी प्रधान सचिव (नवि-२) यांच्या अध्यक्षतेखाली Program Advisory Committee (PAC) समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय-**

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार, प्रधान सचिव (नवि-२) यांच्या अध्यक्षतेखाली Faecal Sludge Treatment Plant (FSTP) कार्यक्रमाच्या अंमलबजावणी व सनियंत्रणासाठी स्थापन करण्यात येणाऱ्या Program Advisory Committee (PAC) समितीची संरचना खालील प्रमाणे राहील.-

| | | | |
|---|---|---|---|
| १) | प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | - | अध्यक्ष |
| २) | आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालयाचा एक प्रतिनिधी | - | सदस्य |
| ३) | The Bill & Melinda Gates Foundation (BMGF) या संस्थेचा एक प्रतिनिधी | - | सदस्य |
| ४) | CWAS, CEPT University या संस्थेचा एक प्रतिनिधी | - | सदस |
| ५) | उप सचिव (नवि-३४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ६) | राज्य अभियान संचालक, राज्य अभियान संचालनालय, मुंबई | - | सदस्य सचिव |

**२. समितीची महत्वाची कार्ये व जबाबदारी पुढील प्रमाणे राहील:-**

१. सदर अभियानाची अंमलबजावणी करणे आणि लक्ष्य साध्य करण्यासाठी तांत्रिक आणि व्यवस्थापकीय मार्गदर्शन पुरविणे.

२. संबंधित जिल्ह्यातील अभियानाच्या/प्रकल्पाच्या भौतिक व आर्थिक प्रगतीचा आढावा घेणे.

३. अभियानाच्या / प्रकल्पाच्या अंमलबजावनीतील अडथळे व अडचणींचा आढावा घेऊन त्यावर उपाययोजना सुचविणे.

४. अभियानाच्या यशस्वी अंमलबजावणीकरिता नागरी स्थानिक स्वराज्य संस्था आणि राज्य अभियान संचालनालय यांनी नगर विकास विभागाकडे उचित शिफारशी करणे.

५. अभियानाच्या अंमलबजावणीत काही त्रुटी आढळल्यास त्याबाबतचे कोणतेही अभिलेख तपासण्याचे तसेच संबंधितास समन्स बजावण्याचे अधिकार सदर समितीस राहतील.

६. वेळोवेळी अंमलबजावणीच्या गुणवत्तेचे मूल्यांकन आणि सुधारणा करीता क्षेत्रीय भेटी आणि समितीतील सदस्याशी सल्लामसलत करणे.

**३. समितीची कार्यपद्धती:**

i. सदर समितीची बैठक दर ३ महिन्यातून एकदा आयोजित करण्यात यावी व सदर बैठकीत अभियानाच्या अंमलबजावणीचा आढावा घेण्यात यावा.

ii. सदर समितीच्या बैठकीचे आयोजन सदस्य सचिव म्हणून राज्य अभियान संचालक, राज्य अभियान संचालनालय यांनी करावे.

iii. सदर समिती मध्ये कोणत्याही सुधारणा करण्याचा अधिकार अध्यक्ष म्हणून प्रधान सचिव (नवि-२) नगर विकास विभाग यांना राहील.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००११७१४४५४८६१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Ajit Sahebrao Palwe

Digitally signed by Ajit Sahebrao Palwe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bcc5dbdaa52955626b8257f1105a8a62ddbd1337948a428b4e4c992e5d3bf423, cn=Ajit Sahebrao Palwe
Date: 2020.01.17 16:57:35 +05'30'

**( अजित पालवे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा .मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा .मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा .राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
७. जिल्हाधिकारी, सर्व
८. आयुक्त, महानगरपालिका (सर्व).
९. मुख्याधिकारी, नगरपालिका/नगरपंचायत (सर्व).
१०. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी), मुंबई.
११. प्रतिनिधी, The Bill & Melinda Gates Foundation (BMGF)
१२. प्रतिनिधी, Center for Environmental Planning and Technology (CEPT)
१३. निवडनस्ती, नवि-३४.